जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन/भत्ते याकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशनला निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ९९७१ - राज्य हिस्सा)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२२/प्र.क्र.६६५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: १६ मे, २०२३

वाचा-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. जजीमि -२०२०/ प्र.क्र.६५/ पापु ०७, दि.०४.११.२०२०
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांचे पत्र क्र. पावस्वससं/वासो०८/प्र.क्र.१३/ ७३३ दि. ०४/०५/२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र. १ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या असुन जल जीवन मिशन अंतर्गत राज्य पाणी स्वच्छता मिशनसाठी ३९ पदे तर जिल्हा पाणी स्वच्छता मिशनकरिता १३६ पदांना मंजूरी देण्यात आली आहे. तसेच, संदर्भिय क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीच्या या पदांवरील वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च (२२१५ ९९७१) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षातील मंजुर तरतूदीतून भागविण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भिय क्र.१ च्या शासन निर्णयानुसार या प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन/भत्ते यांचे केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण ० : १०० असे आहे. त्यानुसार सन २०२३-२०२४ वित्तीय वर्षात उक्त पदांच्या वेतन व भत्त्याकरीता लेखाशीर्ष २२१५ ९९७१ - ३६ या उद्दिष्टशीर्षाखाली रु. २२.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तथापि, लेखाशीर्ष २२१५ ९९७१ हा जल जीवन मिशन अंतर्गत पी.एफ.एम.एस प्रणालीच्या Single Nodal Agency खात्याशी संलग्न (map) असल्यामुळे जल जीवन मिशन अंतर्गत कार्यरत कर्मचा-यांच्या वेतनाचा प्रश्न निर्माण होऊ नये याकरीता लेखाशीर्ष २२१५ ९९७१ -३६ खालील अर्थसंकल्पित निधी २२२१५ ९९७१ -३१ खाली (पी.एफ.एम.एस. प्रणालीमार्फत वितरणाकरीता) वळती करुन देण्याची वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुसार वित्त विभागाने लेखाशीर्ष २२१५ ९९७१ -३१ या

उद्दिष्टशीर्षाखाली माहे मार्च २०२३ ते जुलै -२०२३ या कालावधीकरीता रु. ९.२५ कोटी इतका निधी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देवून वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षामध्ये पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण आणि सहाय्यिकृत बाबी घटकाखाली मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन मिशनकरीता सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने - वेतनेतर (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखाली रु. ९.२५ कोटी (अक्षरी-रु. नऊ कोटी पंचवीस लक्ष फक्त) इतका निधी जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील कर्मचा-यांच्या वेतन व भत्त्यापोटी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक M९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र. ५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

०४. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

०५. जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील कर्मचा-यांच्या वेतन व भत्त्यापोटी मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन मिशनकरीता सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने - वेतनेतर (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखाली वितरित करण्यात येणा-या निधीचा स्वतंत्ररित्या हिशोब ठेवण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र. २०३/ व्यय-३, दि. १५.०५.२०२३ व अनौ.सं.क्र.१०१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१२३३४९८२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.05.16 18:29:50 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०